# श्री शिवलीलामृत : अकरावा अध्याय



मूल्य चार आणे

## अध्याय ११ वा.



# श्री शिवलीलामृत : अकरावा अध्याय

श्रीगणेशाय नमः ॥ धन्य धन्य तेचि जन । जे शिवभजनीं
परायण । सदा शिवलीलामृतश्रवण । अर्चन सदा शिवाचें
॥१॥ सूत म्हणे शौनकादिकांप्रति । जे रुद्राक्षधारण करिती ।
त्यांच्या पुण्या नाहीं मिती । त्रिजगतीं ते धन्य ॥ २ ॥ जो
करी सहस्र रुद्राक्ष धारण । त्यासी वंदिती शक्रादिद्रुहिण[1] ।
तो शंकरचि त्याचें दर्शन । घेतां तरती जीव बहु ॥ ३ ॥
अथवा षोडश[2] षोडश दंडीं जाण । बांधावे रुद्राक्ष सुलक्षण ।
शिखेमाजीं[3] एक धरावा पूर्ण । शिवस्वरूप म्हणवूनियां ॥४॥

१ इंद्र, ब्रह्मदेव वगैरे. २ सोळा. ३ शेंडींत.

त्यावरोनि करितां स्नान । तरी त्रिवेणी[1]स्नान केल्यासमान । असो द्वादश द्वादश मनगटीं पूर्ण । रुद्राक्ष बांधिजे आदरें ॥ ५ ॥ कंठीं बांधावे बत्तीस । मस्तकाभोंवते चोवीस । सहा सहा कर्णीं पुण्य विशेष । बांधितां निर्दोष सर्वदा ॥ ६ ॥ अष्टोत्तर[2]शतमाळा । सर्वदा असावी गळां । एकमुखी रुद्राक्ष आगळा । पूजितां विशेष ऐश्वर्यदायक ॥७॥ पंचमुख षण्मुख अष्टमुख । चतुर्दशमुखी लक्ष्मीकारक । सकळ मंत्र सुफळ-दायक । रुद्राक्षजप नित्य करितां ॥८॥ नित्य रुद्राक्षपूजन ।

---

१ गंगा-यमुना-सरस्वतीच्या संगमाचें स्नान. २ एकशें आठ.

तरी केलें जाणिजे शिवार्चन । रुद्राक्षमहिमा परमपावन ।
इतिहास ऐका येविषयीं ॥ ९ ॥ काश्मीरदेशींचा नृप पावन ।
नामाभिधान ‘भद्रसेन’। विवेकसंपन्न प्रधान । परमचतुर
पंडित ॥ १० ॥ प्रजा दायाद[1] भूसुर[2] । धन्य म्हणती तोचि
राजेश्वर । लांच न घे न्याय करी साचार । अमात्य[3] थोर
तोचि पैं ॥ ११ ॥ सुंदर पतिव्रता मृदुभाषिणी । पूर्वदत्तें[4] ऐसी
लाधिजे कामिनी[5] । सुत सभाग्य विद्वान गुणी । विशेष
सुकृतें पाविजे ॥ १२ ॥ गुरु कृपावंत सर्वज्ञ थोर ।

१ गोत्रज, भाऊबंद. २ ब्राह्मण. ३ प्रधान. ४ पूर्वपुण्यानें. ५ स्त्री.

शिष्य प्रज्ञावंत[1] गुरुभक्त उदार । वक्ता क्षमाशील शास्त्रज्ञ फार । विशेष सुकृतें[2] लाहिजे ॥ १३ ॥ श्रोता सप्रेम चतुर सावधान । यजमान साक्षेपी[3] उदार श्रीसंपन्न । काया आरोग्य सुंदर सुकुलीन । पूर्वसुकृतें प्राप्त होय ॥ १४ ॥ असो तो भद्रसेन आणि प्रधान । बहुत करितां जप-अनुष्ठान[4] । दोघांसी झाले नंदन[5] । शिवभक्त उपजताचि ॥ १५ ॥ राजपुत्र नाम 'सुधर्म' । प्रधानसुत 'तारक' नाम । शिवपूजन करिती उत्तम । सावधान शिवध्यानीं ॥ १६ ॥ बाळें होऊनि सदा प्रेमळ । अनुताप

१ शहाणा. २ पुण्यानें. ३ यत्नवान, उद्योगी. ४ तप. ५ पुत्र.

चित्तीं वैराग्यशील । लौकिकसंग धूर्त अमंगळ । त्यांची संगती नावडे त्यां ॥ १७ ॥ पंचवर्षी दोघे कुमर । लेवविती वस्त्रें अलंकार । गजमुक्त[1] माळा मनोहर । नानाप्रकारें लेवविती ॥१८॥ तंव ते बाळ दोघे जण । सर्वालंकारउपाधी टाकून । करिती रुद्राक्षधारण । भस्म चर्चिती सर्वांगीं ॥ १९ ॥ आवडे सर्वदा एकांत । श्रवण करिती शिवलीलामृत । बोलती शिवनामावळी सत्य । पाहणें शिवपूजा सर्वदा ॥ २० ॥ आश्चर्य करिती राव प्रधान । यांस कां नावडे वस्त्र-भूषण । करिती रुद्राक्षभस्म-

1 हत्तींच्या गंडस्थळांतील मोत्यांच्या माळा.

धारण । सदा स्मरण शिवाचें ॥ २१ ॥ विभूती पुसोनि रुद्राक्ष काढिती । मागुतीं वस्त्रें भूषणें लेवविती । ते सर्वेंचि ब्राह्मणांसी अर्पिती । घेती मागुती शिवदीक्षा ॥ २२ ॥ शिक्षा करितां बहुत । परी ते न सांडिती आपुलें व्रत । राव प्रधान चिंता-ग्रस्त । म्हणती करावें काय आतां ॥ २३ ॥ तों उगवला सुकृतमित्र[1] । घरासी आला गुरु पराशर । सवें वेष्टित ऋषींचे भार । अपरसूर्य[2] तेजस्वी ॥२४ ॥ जो कृष्णद्वैपायनाचा[3] जनिता[4] । त्रिकाळज्ञानी प्रतिसृष्टिकर्ता । जो वसिष्ठाचा नातू तत्त्वतां ।

१ पुण्यरवि. २ प्रतिसूर्यच. ३ व्यासाचा. ४ बाप.

राक्षससत्र जेणें केलें ॥ २५ ॥ जेंवी मनुष्यें वागती अपार। तैसेच पूर्वीं होते रजनीचर[1]। ते पितृकैवारें[2] समग्र। जाळिले सत्र करूनियां ॥ २६ ॥ जनमेजयें सर्पसत्र केलें। तें आस्तिकें मध्येंच राहविलें। पराशरासी पुलस्तीनें[3] प्रार्थिलें। मग वांचले रावणादिक ॥ २७ ॥ विरंचीस दटावूनि क्षणमात्रें। प्रतिसृष्टि केली विश्वामित्रें। तेवीं पितृकैवारें पराशरें। वादी जर्जर पैं केले ॥ २८ ॥ ते सांगावी समूळ कथा। तरी विस्तार होईल ग्रंथा। यालागीं ध्वनितार्थ[4] बोलिलों

१ राक्षस. २ बापाचा सूड उगविण्याकरितां. ३ रावणाचा बाप. ४ संकेतवचन.

पंडितां । कळलें पाहिजे निर्धारें ॥ २९ ॥ ऐसा महाराज पराशर । ज्याचा नातू होय शुकयोगींद्र । तो भद्रसेनाचा कुळगुरु निर्धार । घरा आला जाणोनि ॥ ३० ॥ राव प्रधान सामोरे धांवती । साष्टांग नमूनि घरा आणिती । षोडशोपचारें पूजिती । भाव चित्तीं विशेष ॥ ३१ ॥ समस्तां वस्त्रें-भूषणें देऊन । राव विनवी कर जोडून । म्हणे हे कुमार रात्रंदिन । ध्यान करिती शिवाचें ॥ ३२ ॥ नावडती वस्त्रें अलंकार । रुद्राक्ष-भस्मावरी सदा भर । वैराग्यशील अणुमात्र । भाषण

न करिती कोणासीं ॥ ३३ ॥ इंद्रियभोगावरी नाहीं भर ।
नावडे विलास अणुमात्र । गजवाजियानीं[1] समग्र । आरूढावें[2]
आवडेना ॥ ३४ ॥ पुढें हे कैसे राज्य करिती । हें आम्हांसी
गूढ पडिलें चित्तीं । मग ते दोघे कुमर आणोनि गुरूप्रती ।
दाखविले भद्रसेनें ॥ ३५ ॥ गुरूनें पाहिले दृष्टीसी । जैसे
मित्र[3] आणि शशी[4] । तैसेच तेजस्वी उपमा त्यांसी । नाहीं
कोठें शोधितां ॥ ३६ ॥ यावरी बोले शक्तिसुत[5] । म्हणे हे
कां झाले शिवभक्त । यांची पूर्वकथा समस्त । ऐक तुज

१ हत्ती घोडे इत्यादि वाहनांवर. २ बसणें. ३ सूर्य. ४ चंद्र. ५ पराशर.

सांगतों ॥ ३७ ॥ पूर्वीं काश्मीरदेशांत उत्तम । महापट्टण 'नंदिग्राम'। तेथील वारांगना मनोरम। 'महानंदा' नाम तियेचें ॥ ३८ ॥ त्या ग्रामींचा तोचि भूप । पृथ्वीमाजीं निःसीम स्वरूप । ललितांकृती पाहोनि कंदर्प । तन्मय होवोनि नृत्य करी ॥ ३९ ॥ जैसा उगवला पूर्णचंद्र । तैसें तिजवरी विराजे छत्र । रत्नखचित यांनें अपार । भाग्या पार नाहीं तिच्या ॥ ४० ॥ रत्नमय दंडयुक्त । चामरें जीवरी सदा ढळत । मणिमय पादुका रत्नखचित । चरणीं जिच्या सर्वदा

१ वेश्या. २ सुंदर शरीर. ३ मदन. ४ वाहनें. ५ चवऱ्या.

॥ ४१ ॥ विचित्र वसनें[1] दिव्य सुवास । हिरण्यमय[2] रत्नपर्यंक[3]
राजस । चंद्ररश्मिसम[4] प्रकाश । शय्या जिची अभिनव पैं ॥४२॥
दिव्याभरणीं[5] संयुक्त । अंगीं सुगंध विराजित । गोमहिषी
खिल्लारें बहुत । वाजी गज सेना देखा ॥ ४३ ॥ दास-दासी
अपार । घरीं माता सभाग्य सहोदर । जिचें गायन ऐकतां
किन्नर । तटस्थ होती कोकिळा ॥ ४४ ॥ जिच्या नृत्याचें
कौशल्य देखोन । सकळ नृप डोलविती मान । तिचा भोग-
काम इच्छून । भूप सभाग्य येती घरा ॥४५॥ वेश्या असूनि

१ वस्त्रें. २ सुवर्णमय. ३ रत्नखचित पलंग. ४ चंद्रकिरणासारखा. ५ दिव्यालंकारांनीं.

पतिव्रता । नोमला जो पुरुष तत्त्वतां । त्याचा दिवस न सरतां । इंद्रासही वश्य नोहे ॥४६॥ परम शिवभक्त विख्यात । दानशीळ उदार बहुत । सोमवार प्रदोषव्रत । शिवरात्र करी नेमेंसी ॥४७॥ अन्नछत्र सदा चालवीत । नित्य लक्ष-त्रिदळीं[1] शिव पूजित । ब्राह्मणहस्तें अद्भुत । अभिषेक करवी शिवासी ॥४८॥ याचक[2] मनीं जें जें इच्छीत । तें तें महानंदा पुरवीत । कोटिलिंगें करवीत । श्रावणमासीं अत्यादरें ॥४९॥ ऐक भद्रसेना सावधान । कुक्कुट[3] मर्कट[4] पाळिले प्रीतीकरून ।

१ बेलपत्रींनीं. २ भिक्षेकरी. ३ कोंबडा. ४ माकड.

त्यांच्या गळां रुद्राक्ष बांधोन । नाचूं शिकविलें कौतुकें ॥५०॥
आपुलें जें का नृत्यागार[1] । तेथें शिवलिंग स्थापिलें सुंदर ।
कुक्कुट मर्कट त्यासमोर । तेथेंचि बांधी प्रीतीनें ॥५१॥ करी
शिवलीलापुराणश्रवण । तेही ऐकती दोघेजण । सवेंचि
महानंदा करी गायन । नृत्य करी शिवापुढें ॥५२॥ महानंदा
त्यांसी सोडून । नृत्य करवी कौतुकेंकरून । त्यांच्या[2] गळां
कपाळीं जाण । विभूति चर्ची स्वहस्तें ॥ ५३ ॥ एवं तिच्या
संगतीकरून[3] । त्यांसी घडतसे शिवभजन । असो तिचें सत्त्व

1 नृत्यशाळा. २ कुक्कुट-मर्कटांच्या. ३ संगतीमुळें.

पाहावया लागोन । सदाशिव पातला ॥ ५४ ॥ सौदागराचा[1]
वेष धरिला । महानंदेच्या सदनां[2] आला । त्याचें स्वरूप
देखोनि ते अबला । तन्मय झाली तेधवां ॥ ५५ ॥ पूजा
करोनि स्वहस्तकीं । त्यास बैसविलें रत्नमंचकीं । तों पृथ्वी-
मोलाचें हस्तकीं । कंकण त्याच्या देखिलें ॥ ५६ ॥ देखतां
गेली तन्मय होऊन । म्हणे स्वर्गीची वस्तु वाटे पूर्ण ।
विश्वकर्म्यानें निर्मिली जाण । मानवी[3] कर्तृत्व हें नव्हे
॥ ५७ ॥ सौदागरें तें काढून । तिच्या हस्तकीं घातलें

१ वाण्याचा, सावकाराचा. २ घराला. ३ मनुष्याचें.

कंकण । येरी होवोनि आनंदघन । नेम करी तयासी ॥ ५८ ॥
पृथ्वीचें मोल हें कंकण । मीही बत्तीसलक्षणी पद्मिण । तीन
दिवस संपूर्ण । दासी तुमची झाल्यें मी ॥ ५९ ॥ तयासी
तें मानलें । सर्वेंचि त्याणें दिव्यलिंग काढिलें । सूर्यप्रभेहून
आगळें । तेज वर्णिलें नवजाय ॥ ६० ॥ लिंग देखोनि ते
वेळीं । महानंदा तन्मय झाली । म्हणे जय जय चंद्रमौळी ।
म्हणोनि वंदी लिंगातें ॥ ६१ ॥ म्हणे या लिंगाच्या
प्रभेवरूनी । कोटी कंकणें टाकावीं ओंवाळुनी । सौदागर

म्हणे महानंदेलागुनी । लिंग ठेवीं जतन हें ॥ ६२ ॥ म्हणे या लिंगापाशीं माझा प्राण । भंगलें कां गेलें दग्ध होऊन । तरी मी अग्निप्रवेश करीन । महाकठीण व्रत माझें ॥ ६३ ॥ येरीनें अवश्य म्हणोन । ठेविलें नृत्यागारीं नेऊन । मग दोघें करिती शयन । रत्नखचित मंचकीं ॥ ६४ ॥ तिचें कैसें आहे सत्त्व । धैर्य पाहे सदाशिव । भक्त तारावया अभिनव । कौतुकचरित्र दाखवी ॥ ६५ ॥ त्याचे आज्ञेंकरून । नृत्यशाळेस लागला अग्न । जन धांवों लागले चहूंकडोन ।

एकचि हांक जाहली ॥ ६६ ॥ तीस सावध करी मदनारी[1] ।
म्हणे अग्नि लागला ऊठ लवकरी । येरी उठली घाबरी ।
तंव वातानें[2] अग्न चेतला ॥ ६७ ॥ तैशामाजीं उडी घालून ।
कंठपाश त्यांचे काढून । कुक्कुट मर्कट दिधले सोडून । गेले
पळोन वनाप्रती ॥ ६८ ॥ नृत्यशाळा भस्म झाली समग्र ।
मग शांत झाला सप्तकर[3] । यावरी पुसे सौदागर ।
महानंदेप्रती तेधवां ॥ ६९ ॥ माझें दिव्य लिंग आहे कीं
जतन[4] । महानंदा घाबरी ऐकोन । वक्षःस्थळ[5] घेत बडवून ।

१ शंकर. २ वाऱ्यानें. ३ अग्नि. ४ जिवंत. ५ छाती.

म्हणे दिव्यलिंग दग्ध जाहलें ॥ ७० ॥ सौदागर[1] बोले वचन । नेमाचा आजि दुसरा दिन । मी आपला देतों प्राण । लिंगाकारणें तुजवरी ॥ ७१ ॥ मग त्रिचरण[2] चेतविला । आकाशपंथें जाती ज्वाला । सौदागर सिद्ध झाला । समीप आला कुंडापाशीं ॥ ७२ ॥ अति लाघवी[3] उमारंग[4] । जो भक्तजनभवभंग । उडी घातली सवेग । 'ॐनमःशिवाय' म्हणोनि ॥ ७३ ॥ ऐसें देखतां महानंदा । बोलावी सर्वब्रह्म-वृंदा । लुटविली सर्व संपदा । कोशसमवेत[5] सर्वही ॥ ७४ ॥

१ तो व्यापारी. २ अग्नि. ३ कपटी, गारुडी. ४ शंकर. ५ खजिन्यासहित.

अश्वशाळा गजशाळा संपूर्ण । सर्व संपत्तीसहित करी गृह-
दान । महानंदेनें स्नान करून । भस्म अंगीं चर्चिलें ॥७५॥
रुद्राक्ष अंगीं लेऊन । हृदयीं चिंतिलें शिवध्यान । 'हर-हर-
शिव' म्हणून । उडी निःशंक घातली ॥ ७६ ॥ सूर्यबिंब
निघे उदयाचळीं । तैसा प्रगटला कपालमाळी[1] । दशभुज
पंचवदन चंद्रमौळी । संकटीं पाळी भक्तांतें ॥ ७७ ॥ माथां
जटांचा भार । तृतीयनेत्र वैश्वानर[2] । शिरीं झुळझुळ वाहे नीर[3] ।
अभयंकर महाजोगी ॥ ७८ ॥ चंद्रकळा तयाचे शिरीं ।

१ नरकपाल हातांत धरून भिक्षा मागणारा शंकर. २ अग्नि. ३ गंगा.

नीळकंठ खट्वांगधारी । भस्म चर्चिलें शरीरीं । गजचर्म पांघुरला ॥ ७९ ॥ नेसलासे व्याघ्रांबर । गळां मनुंष्यमुंडांचे[1] हार । सर्वांगीं वेष्टिले फणिवर[2] । दशभुजा मिरविती ॥८०॥ वरचेवरी कंदुक[3] झेलित । तेवीं दहा भुजा पसरोनि अकस्मात । महानंदेस झेलूनि धरित । हृदयकमळीं परमात्मा ॥८१॥ म्हणे जाहलों मी सुप्रसन्न । महानंदे माग वरदान । ती म्हणे हें नगर[4] उद्धरून । विमानीं बैसवीं दयाळा ॥ ८२ ॥ माता-बंधूसमवेत । महानंदा विमानीं बैसत । दिव्यरूप पावोनि

१ रुंडमाळांचे. २ सर्प. ३ चेंडू. ४ नंदिग्राम शहर.

त्वरित । नगरासमवेत चालली ॥८३॥ पावलीं सकळ शिवपदीं । जेथें नाहीं आधि-व्याधी । क्षुधा-तृषाविरहित त्रिशुद्धी । भेदबुद्धी कैंची तेथें ॥ ८४ ॥ नाहीं काम-क्रोधद्वंद्वदुःख । मद-मत्सर नाहीं निःशंक । जेथींचें गोड उदक । अमृताहून कोटिगुणें ॥ ८५ ॥ जेथें सुरतरूंचीं[2] वनें अपारें । सुरभींचीं[1] बहुत खिल्लारें । चिंतामणीच्चीं धवलागारें[3] । भक्तांकारणें निर्मिलीं ॥ ८६ ॥ जें जें वासनेंत[4] बोलती शिवदास । तें तें प्राप्त होय तयांस । शिवपद सर्वदा अविनाश । महानंदा तेथें पावली

१ कामधेनूचीं. २ कळप, समुदाय. ३ वाडे महाल. ४ निद्रेंत बरळतांना.

॥ ८७ ॥ हे कथा परम सुरस । पराशर सांगे भद्रसेनास । म्हणे हे कुमर दोघे निःशेष । कुक्कुट मर्कट पूर्वींचे ॥ ८८ ॥ कंठीं रुद्राक्ष धारण । भाळीं विभूति चर्चून । त्याच पूर्वपुण्यें करून । सुधर्म-तारक उपजले ॥ ८९ ॥ हे पुढें राज्य करितील निर्दोष । बत्तीस लक्षणी डोळस । शिवभजनीं लाविती बहुतांस । उद्धरतील तुम्हांतें ॥ ९० ॥ अमात्यासहित भद्रसेन । गुरूसी घाली लोटांगण । म्हणे इतुकेन मी जी धन्य । सुपुत्र जन्मले उदरीं ॥ ९१ ॥ भद्रसेन बोलत पुढती । हे राज्य किती

वर्षें करिती । आयुष्यप्रमाण किती । सांगा यदर्थीं गुरुवर्यीं
॥ ९२ ॥ बहुत करितां नवस । येवढाच पुत्र आम्हांस । परम
प्रियकर राजस । प्राणांहुन आवडे बहु ॥९३॥ तुमच्या आगमनें[१]
करून । स्वामी मज समाधान । तरी या पुत्राचें आयुष्यप्रमाण ।
सांगा स्वामी तत्त्वतां ॥ ९४ ॥ ऋषि म्हणे मी सत्य बोलेन देख ।
परी तुम्हांसी ऐकतां वाटेल दुःख । हे सभा सकळिक ।
दुःखार्णवीं[२] पडेल पैं ॥९५॥ प्रत्ययसदृश[३] बोलावें वचन । ना तरी
आंगास येतें मूर्खपण । तुम्हां वाटेल विषाहून । विष विशेष

१ येण्यानें. २ दुःखसमुद्रांत. ३ अनुभवास येण्यासारखें.

ते गोष्टी ॥ ९६ ॥ भद्रसेन म्हणे सत्य वचन । बोला न करावा अनमान । तरी तव पुत्रास बारा वर्षें पूर्ण । झालीं असती जाण पां ॥ ९७ ॥ आजपासोनि सातवे दिवशीं । मृत्यु पावेल या समयासी । राव ऐकतां धरणीसी । मूर्च्छा येऊनि पडियेला ॥ ९८ ॥ अमात्यासहित त्या स्थानीं । दुःखार्णवीं गेले आहाळोनी । अंतःपुरीं सकळ कामिनी । आक्रांत करिती आक्रोशें ॥ ९९ ॥ करूनियां हाहाकार । वक्षःस्थळ पिटी नृपवर । मग रायासी पराशर । सावध करोनी गोष्टी सांगे ॥ १०० ॥

नृपश्रेष्ठा न सोडीं धीर । एक एक सांगतों विचार । जें पंच-
भूतें नव्हतीं समग्र । शशि[1]-मित्र नव्हते ते ॥ १ ॥ नव्हता
मायामय विकार । केवळ ब्रह्मानंद साचार । तेथें झालें स्फुरण
जागर[2] । 'अहं ब्रह्म' म्हणोनियां ॥ २ ॥ ते ध्वनी माया सत्य ।
तेथोनि जाहलें महत्तत्त्व । मग त्रिविध अहंकार होय ।
शिवइच्छेकरूनियां ॥ ३ ॥ सत्त्वांशें निर्मिला पीतवसन[3] ।
रजांशें सृष्टिकर्ता द्रुहिण[4] । तमांशें रुद्र परिपूर्ण । सर्गस्थित्यंत
करविता ॥ ४ ॥ विधीस[5] म्हणे सृष्टि रचीं पूर्ण । येरु

१ चंद्र व सूर्य. २ जागृति. ३ विष्णु. ४ ब्रह्मदेव. ५ ब्रह्मदेवाला.

म्हणे मज नाहीं ज्ञान। मग शिवें तयालागून । चारी वेद उपदेशिले ॥ ५ ॥ चहूं वेदांचें सार पूर्ण । तो हा ' रुद्राध्याय ' परम पावन । त्याहूनि विशेष गुह्यज्ञान । भुवनत्रयीं असेना ॥ ६ ॥ बहुत करीं हा जतन । त्याहूनि आणिक थोर नाहीं साधन । हा रुद्राध्याय शिवरूप संपूर्ण । सर्वरक्षण सर्वांशीं ॥ ७ ॥ जे रुद्राध्याय ऐकती पढती । त्यांच्या दर्शनें जीव उद्धरती । मग कमलोद्भव एकांतीं । सप्तपुत्रां सांगे रुद्र हा ॥ ८ ॥ मग सांप्रदाय ऋषीपासोन ।

भूतळीं आला अध्याय जाण । थोर जप तप ज्ञान । त्याहूनि अन्य नसेचि ॥ ९ ॥ जो हा अध्याय जपे संपूर्ण । त्याचेनि दर्शनें तीर्थें पावन । स्वर्गींचे देव दर्शन । त्याचें इच्छिती जाण पां ॥ ११० ॥ जप तप विधान आचरण । याहूनि थोर नाहीं जाण । रुद्रमहिमा अगाध पूर्ण । किती म्हणोनि वर्णावा ॥ ११ ॥ रुद्रमहिमा वाढला फार । ओस[1] पडिलें भानुपुत्रनगर[2] । पाश सोडोनि यमकिंकर[3] । रिते[4] हिंडों लागले ॥ १२ ॥ मग यमें विधीलागीं पुसोन । अभक्तिकृत्या[5]

१ शून्य, ओसाड. २ यमनगरी. ३ यमदूत. ४ रिकामे. ५ अभक्तिरूप राक्षसी.

निर्मिली दारुण । तिणें कुतर्कवादी भेदी लक्षून । त्यांच्या
हृदयीं संचरली ॥ १३ ॥ त्यांसी मत्सर वाढवला विशेष ।
वाटे करावा शिवद्वेष । तेणें ते जावोनि यमपुरीस । महानरकीं
राहती सदा ॥ १४ ॥ यम सांगे दूतांप्रती । शिवद्वेषी जे
पापमती । ते अल्पायुषी होती । नानारीतीं जाचणी करा
॥ १५ ॥ शिव थोर विष्णु लहान । हरि विशेष हर गौण ।
ऐसें म्हणती जे त्यांलागून । आणोनि नरकीं घालावे ॥ १६ ॥
रुद्राध्याय नावडे ज्यांसी । कुंभीपाकीं घालावें त्यांसी । रुद्रा-

नुष्ठानें आयुष्यासी । वृद्धि होय निर्धारें ॥ १७ ॥ याकरितां भद्रसेना अवधारीं । अयुत[1] रुद्रावर्तनें करीं । शिवावरी अभिषेकधार धरीं । मृत्यु होय दूरी साचा ॥१८॥ अथवा शत घट स्थापून । दिव्य वृक्षांचे पल्लव आणून । रुद्रें उदक अभिमंत्रून । अभिषिंचन पुत्रा करीं ॥ १९ ॥ नित्य दहा सहस्र आवर्तनें पूर्ण । क्षोणीपाळा[2] करीं सप्तदिन । रायें धरिले दृढ चरण । सद्गद होवोनि बोलत ॥ १२० ॥ सकळ ऋषिरत्नमंडित पदक । त्यांत स्वामी तूं मध्य नायक ।

१ दहा हजार. २ पृथ्वीपते.

काळ मृत्यु भय शोक । गुरु रक्षी त्यांपासूनी ॥ २१ ॥
तरी त्वां आचार्यत्व करावें पूर्ण । तुजसवें जे आहेत ब्राह्मण ।
आणीक सांगसी ते बोलावून । आतांचि आणितों आरंभीं
॥ २२ ॥ मग सहस्र विप्र बोलावून । ज्यांची रुद्रानुष्ठानीं भक्ति
पूर्ण । न्यासध्यानविधियुक्त पढून । गुरूपासून जे कां आले
॥ २३ ॥ परदारा आणि परधन । ज्यांस वमनाहूनि नीच[1]
पूर्ण । विरक्त सुशील गेलिया प्राण । दुष्टप्रतिग्रह[2] न घेती
॥ २४ ॥ जे शापानुग्रहसमर्थ । सामर्थ्यें चालों न देती मित्ररथ[3] ।

१ ओकीपेक्षां. २ वाईट पदार्थांचें दान. ३ सूर्याचा रथ.

श्रीशिवलीलामृत [ ३१ ] अध्याय अकरावा

किंवा साक्षात उमानाथ । पुढें आणोनि उभा करिती ॥२५॥
ऐसे लक्षणयुक्त ब्राह्मण । बैसला व्यासपिता[1] घेऊन । सहस्र
घट मांडून । अभिमंत्रोनि स्थापिले ॥२६॥ स्वर्धुनीचें[2] सलिलें[3]
भरलें पूर्ण । त्यांत आम्रपल्लव घालून । रुद्रघोष करिती
ब्राह्मण । अनुष्ठान दिव्य मांडिलें ॥ २७ ॥ शास्त्रसंख्या[4] झाले
दिवस । सातवे दिवशीं मध्याह्नीं आला चंडांश[5] । मृत्युसमय
येतां धरणीस[6] । बाळ मूर्च्छित पडियेला ॥ २८ ॥ एक मुहूर्त
पर्यंत । चलन-वलन राहिलें समस्त । परम घाबरला नृपनाथ ।

१ पराशर. २ गंगेचें. ३ पाणी. ४ सहा. ५ सूर्य. ६ पृथ्वीवर.

गुरु देत नाभिकारातें ॥ २९ ॥ रुद्रोदक शिंपोन । सावध[1] केला राजनंदन । त्यासी पुसती वर्तमान । वर्तलें तेंचि सांगत ॥ १३० ॥ एक काळपुरुष भयानक थोर । ऊर्ध्वजटा कपाळीं शेंदुर । विक्राळ दाढा भयंकर । नेत्र खदिरांगारासारखे ॥ ३१ ॥ तो मज घेऊनि जात असतां । चौघे पुरुष धांवोनि आले तत्त्वतां । पंचवदन दशभुज त्यांची साम्यता । कमळ-भवांडीं[2] दुजी नसे ॥ ३२ ॥ ते तेजें जैसे गभस्ती[3] । दिगंत[4] तमें[5] संहारिती । भस्म अंगीं व्याघ्रांबर दिसती । दशहस्तीं

१ अभय. २ ब्रह्मदेवाच्या ब्रह्मांडांत. ३ सूर्य. ४ दशदिशांतील. ५ अंधकार.

आयुधें ॥ ३३ ॥ ते महाराज येऊन । मज सोडविलें तोडोनि बंधन । त्या काळपुरुषासी धरून । करीत ताडण नेलें तिहीं ॥ ३४ ॥ ऐसें पुत्रमुखींचें ऐकतां उत्तर । भद्रसेन करी जय-जयकार । ब्राह्मणांस घाली नमस्कार । आनंदाश्रु नेत्रीं आले ॥ ३५ ॥ अंगीं रोमांच दाटले । मागुता विप्रचरणीं गडबडां लोळे । शिवनाम गर्जत तये वेळे । देव सुमनें वर्षती ॥३६॥ अनेक वाद्यांचे गजर । डंका गर्जे अवघ्यांत थोर । मुख-द्वयाचीं महासुस्वर । मृदंग वाद्यें गर्जती ॥ ३७ ॥ कांस्य

टाळांचे गजर । शिवलीळा गाती अपार । शृंगें भृंगें काहाळ[1]
थोर । सनया अपार वाजती ॥ ३८ ॥ चंद्रानना धडकती
भेरी । नादा न समायें नभोदरीं[2] । असो भद्रसेन यावरी ।
विधियुक्त होम करीतसे ॥ ३९ ॥ षड्रस अन्नें शोभिवंत ।
अलंकार दिव्य वस्त्रें देत । अमोलिक वस्तु अद्भुत ।
आणोनि अर्पी ब्राह्मणांसी ॥ १४० ॥ दक्षिणेलागीं भांडारें[3] ।
मुक्त केलीं राजेंद्रें । म्हणे आवडे तितुकें भरा एकसरें । मागें
पुढें पाहूं नका ॥ ४१ ॥ सर्व याचक केले तृप्त । 'पुरे पुरे'

१ एकप्रकारचीं वाद्यें. २ आकाशांत. ३ खजिने.

हेचि मात[1] । धनभार झाला बहुत । म्हणोनि सांडिती ठाईं
ठाईं ॥ ४२ ॥ ब्राह्मण देती मंत्राक्षता । विजय कल्याण हो
तुझिया सुता । ऐसा अत्यानंद होत असतां । आश्चर्य एक
वर्तलें ॥४३॥ वसंत येत सुगंधवनीं । कीं काशीक्षेत्रीं स्वर्धुनी[2] ।
कीं श्वेतोत्पलें[3] मृडानी-[4] । रमणलिंग अर्चिजे ॥ ४४ ॥ कीं
निर्दैवास[5] सांपडे चिंतामणि । कीं क्षुधितापुढें क्षीराब्धी ये
धांवोनी । तैसा कमलोद्भवनंदन ते क्षणीं । नारदमुनि पातला
॥४५॥वाल्मीक सत्यवतीनंदन । औत्तानपादी[6] कयाधूहृदयरत्न[7] ।

---

१ गोष्ट, शब्द. २ गंगा. ३ पांढऱ्या कमलांनीं. ४ पार्वतीपतीचें लिंग. ५ दरिद्र्यास. ६ ध्रुव. ७ प्रल्हाद.

हे शिष्य ज्याचे त्रिभुवनीं जाण । वंद्य जे कां सर्वांतें ॥४६॥
जो चतुं:षष्टिकळाप्रवीण निर्मळ । चतुर्दशविद्या करतलामळ ।
ज्याचें स्वरूप पाहतां केवळ । नारायण दुसरा कीं ॥ ४७ ॥
हें कमंलभवांड मोडोनी । पुनःसृष्टी करणार माशुतेनी ।
अन्याय विलोकितां नयनीं । दंडें ताडील शक्रादिकां ॥४८॥
तो नारद देखोनि तेच क्षणीं । कुंडांतूनि मूर्तिमंत निघे
अग्नी । दक्षिणाग्नि-गार्हपत्य-आहवनी । उभे ठाकले देखतां
॥४९॥ पराशरादि सकळ ब्राह्मण । प्रधानासहित भद्रसेन ।

१ चौसष्ट. २ ब्रह्मांड.

धांवोनि धरी तयाचे चरण । ब्रह्मानंद उचंबळला ॥ १५० ॥
दिव्य गंध दिव्य सुमनीं । षोडशोपचारें पूजिला नारदमुनी ।
राव उभा ठाके कर जोडोनी । म्हणे स्वामी अतींद्रियद्रष्टा तूं
॥ ५१ ॥ त्रिभुवनीं गमन तुझें सर्व । कांहीं देखिलें सांग
अपूर्व । नारद म्हणे " मार्गीं येतां शिव- । दूत चौघे देखिले
॥ ५२ ॥ दशभुज पंचवदन । तिहीं मृत्यु नेला बांधोन ।
तुझ्या पुत्राचें चुकविलें मरण । रुद्रानुष्ठान धन्य केलें ॥५३॥
तव पुत्ररक्षणार्थ ते वेळां । शिवें वीरभद्र मुख्य पाठविला ।

मज[1] देखतां मृत्यूस[2] पुसूं लागला । शिवसुत[3] ऐका तें ॥ ५४ ॥
तूं कोणाच्या आज्ञेकरून । आणीत होतासी भद्रसेननंदन ।
त्यास दहा सहस्र वर्षें पूर्ण । आयुष्य असे निकोप[4] पैं ॥ ५५ ॥
तो सार्वभौम होईल तत्त्वतां । रुद्रमहिमा तुज ठाउका असतां ।
शिवमर्यादा उल्लंघूनि तत्त्वतां । कैसा आणीत होतासी ॥ ५६ ॥
मग चित्रगुप्ता बोलावून । पत्रिका पाहिली वाचून । तंव
द्वादशवर्षीं मृत्युचिन्ह । गंडांतर थोर होतें ॥ ५७ ॥ तें
महापुण्यें निरसूनि सहज । दहासहस्र वर्षें करावें राज्य ।

१ माझ्यादेखत. २ यमाला. ३ वीरभद्र. ४ रोगरहित, उत्तम.

मग तो सूर्यनंदन महाराज । स्वापराधें कष्टी बहू ॥ ५८ ॥
मग उभा ठाकून कृतांत[1] । कर जोडूनि स्तवन करित । हे
अपर्णाधव[2] हिमनगजामात[3] । अपराध न कळतां घडला हा"
॥ ५९ ॥ ऐसें नारदें सांगतां ते क्षणीं । राव पायांवर घाली
लोळणी । आणिक सहस्ररुद्र करूनी । महोत्साव केला बहु
॥ १६० ॥ शतरुद्र करितां निःशेष । शतायु होय तो पुरुष ।
हा अध्याय पढतां निर्दोष । तो शिवरूप याच देहीं ॥ ६१ ॥
तो येथेंचि झाला मुक्त । त्याच्या तीर्थें तरती बहुत । असो

१ यम. २ पार्वतीपति शंकर. ३ हिमालयाचा जांवई.

यावरी ब्रह्मसुत[1] । अंतर्धान पावला[2] ॥६२॥ आनंदमय शक्ति-नंदन[3] । रायें शतपद्म धन देऊन । तोषविला गुरु संपूर्ण । ऋषीसहित जाता झाला ॥ ६३ ॥ हें भद्रसेन आख्यान जे पढती । त्यांस होय आयुष्यसंतती । त्यांसी काळ न बाधे अंतीं । वंदोनि नेती शिवपदा ॥ ६४ ॥ दशशतकपिलादान[4] । ऐकतां पढतां घडे पुण्य । केलें असेल अभक्ष्यभक्षण । सुरापान[5] ब्रह्म-हत्या ॥ ६५ ॥ एवं महापापपर्वत तत्त्वतां । भस्म होती श्रवण करितां । हा अध्याय त्रिकाळ वाचितां । गंडांतर दूर होय

१ नारद. २ गुप्त झाला. ३ पराशर. ४ सहस्र गोदान. ५ मद्यप्राशन.

॥ ६६ ॥ यावरी कलियुगीं निःशेष । शिवकीर्तनाचा महिमा विशेष । आयुष्यवर्धक लोकांस । अनुष्ठान हेंचि निर्धारें ॥६७॥ मग तो राव भद्रसेन । सुधर्मपुत्रास राज्य देऊन । युवराज्य तारकालागून । देता झाला ते काळीं ॥ ६८ ॥ मग प्रधाना-समवेत राव जाणा । जाता झाला तपोवना । शिवअनुष्ठान रुद्रध्याना । करितां महारुद्र संतोषला ॥६९॥ विमानीं बैसवूनी त्वरित । राव प्रधान नेले मिरवत । विधि-शक्र-वैकुंठवास[1] बहुत । स्वेच्छेंकरूनी राहिले ॥ १७० ॥ शेवटीं शिवपदासी

[1] ब्रह्मलोक, इंद्रलोक व वैकुंठलोक ह्यांमध्यें निवास.

पावून । राहिले शिवरूप होऊन। हा अकरावा अध्याय जाण। स्वरूप एकादश रुद्रांचें ॥ ७१ ॥ हा अध्याय करितां श्रवण। एकादश रुद्रां समाधान। कीं हा कल्पद्रुम संपूर्ण। इच्छिलें फल देणार ॥ ७२ ॥ मृत्युंजयजप रुद्रानुष्ठान। त्यास न बाधी ग्रहपीडा विघ्न। पिशाचबाधा रोग दारुण। न बाधीच सर्वथाही ॥ ७३ ॥ येथें जो मानील अविश्वास। तो होईल अल्पायुषी तामस। हें निंदी तो चांडाळ निःशेष। त्याचा विटाळ न व्हावा ॥ ७४ ॥ त्यास प्रसवोनि वांझ झाली माता। त्याची

संगती न धरावी तत्त्वतां । त्यांसी संभाषण करितां । महा-
पातक जाणिजे ॥ ७५ ॥ त्यास आपल्या गृहा न आणावें ।
आणि आपण त्यांच्या सदना न जावें । ते त्यजावे जीवें-
भावें । जेवीं सुशील हिंसकगृह ॥ ७६ ॥ जो प्रत्यक्ष भक्षितो
विष । जे मूर्ख बैसती त्याचे पंक्तीस । त्यांसी मृत्यु आला या
गोष्टीस । संदेह कांहीं असेना ॥ ७७ ॥ असो सर्वभावें निश्चित ।
अखंड पाहावें शिवलीलामृत । हें न घडे त्वरित । हा अध्याय
तरी वाचावा ॥ ७८ ॥ या अध्यायाचें करितां अनुष्ठान ।

तयासी नित्य रुद्र केल्याचें पुण्य । त्याचे घरीं अनुदिन । ब्रह्मानंद प्रगटेल ॥ ७९ ॥ अपर्णाहृदयाब्जमिलिंद । श्रीधरस्वामी ब्रह्मानंद । जो जगदानंदमूळकंद । अभंग न विटे कालत्रयीं ॥ १८० ॥ शिवलीलामृत ग्रंथ प्रचंड । स्कंदपुराण ब्रह्मोत्तरखंड । परिसोत सज्जन अखंड । एकादशोऽध्याय गोड हा ॥ १८१ ॥

॥ श्रीसांबसदाशिवार्पणमस्तु ॥ शुभं भवतु ॥

# ॥ शिवस्तुति ॥

श्रीगणेशाय नमः ॥ कैलासराणा शिव चंद्रमौळी । फणींद्र माथां मुकुटीं झळाळी ॥ कारुण्यसिंधू भवदुःखहारी । तुजवीण शंभो मज कोण तारी ॥ १ ॥ रवींदु दावानल पूर्ण भाळीं । स्वतेजनेत्रीं तिमिरांध जाळी ॥ ब्रह्मांडधीशा मद्नांतकारी । तुज० ॥ २ ॥ जटा विभूती उटि चंद्नाची । कपालमाला प्रित गौतमीची ॥ पंचानना विश्वनिवांतकारी । तुज० ॥ ३ ॥ वैराग्ययोगी शिव शूळ-पाणी । सदा समाधी निजबोधवाणी ॥ उमानिवासा त्रिपुरांतकारी । तुज० ॥ ४ ॥ उदारमेरू पति शैलजेचा । श्रीविश्वनाथ म्हणती सुरांचा ॥ दयानिधी देव गजचर्मधारी । तुज० ॥ ५ ॥ ब्रह्मादि वंदी अमरादिनाथ । भुजंगमाला धरि सोमकांत ॥ गंगा शिरीं दोष महा विदारी । तुज० ॥ ६ ॥ कर्पूरगौरी गिरिजा विराजे । हळाहळें कंठ निळाच साजे ॥ दारिद्र्यदुःखा स्मरणें निवारी । तुज० ॥ ७ ॥ स्मशानक्रीडा करितां सुखावे ॥ तो देवचूडामणि कोण आहे ॥ उदासमूर्ती

जटाभस्मधारी । तुज० ॥ ८ ॥ भूतादिनाथ अरि अंतकाचा । तो स्वामि माझा ध्वज शांभवाचा ॥ राजा महेश बहुबाहुधारी । तुज० ॥ ९ ॥ नंदी हराचा हरिनंदिकेश । श्रीविश्वनाथ म्हणती सुरेश ॥ सदाशिव व्यापक तापहारी । तुज० ॥ १० ॥ भयानक भीम विक्राळ नग्न । लीलाविनोदें करि काम भग्न ॥ तो रुद्र विश्वंभर दक्ष मारी । तुज० ॥ ११ ॥ इच्छा हराची जग हें विशाळ । पाळी रची तो करि ब्रह्मगोळ ॥ उमापती भैरव विघ्नहारी । तुज० ॥ १२ ॥ भागीरथीतीर सदा पवित्र । जेथें असे तारक ब्रह्ममंत्र ॥ विश्वेश विश्वंभर त्रिनेत्रधारी । तुज० ॥ १३ ॥ प्रयाग वेणी सकळां हराच्या । पदारविंदीं वहाती हरीच्या ॥ मंदाकिनी मंगल मोक्षकारी । तुज० ॥ १४ ॥ कीर्ती हराची स्तुति बोलवेना । कैवल्यदाता मनुजां कळेना ॥ एकाग्रनाथ विष अंगिकारी । तुज० ॥ १५ ॥ सर्वांतरव्यापक जो नियंता । तो प्राणलिंगाजवळी महंता ॥ अंकीं उमा ते गिरिरूपधारी । तुज० ॥ १६ ॥ सदा तपस्वी असे कामधेनू । सदा सतेज शशिकोटिभानू ॥ गौरीपती जो सदा

भस्मधारी । तुज० ॥ १७ ॥ कर्पूरगौर स्मरल्या विसांवा । चिंता हरी जो भजकां सदैवा ॥ अंतीं स्वहीत सुचना विचारी । तुज० ॥ १८ ॥ विरामकाळीं विकळ शरीर । उदास चित्तीं न धरीच धीर ॥ चिंतामणी चिंतनें चित्तहारी । तुज० ॥ ॥ १९ ॥ सुखावसानें सकळें सुखाचीं । दुःखावसानें टळती जगाचीं ॥ देहावसानीं धरणी थरारी । तुज० ॥ २० ॥ अनुहातशब्द गगनीं न माय । तिचेनि नादें भव शून्य होय ॥ कथा निजांगें करुणाकुमारी । तुज० ॥ २१ ॥ शांतिस्वलीला वदनीं विलासे । ब्रह्मांडगोळीं असुनी न दीसे ॥ भिल्ली भवानी शिव ब्रह्मचारी । तुज० ॥ २२ ॥ पीतांबरें मंडित नाभि ज्याची ॥ शोभा जडीत वरि किंकिणीची ॥ श्रीवेददत्त दुरितांतकारी । तुज० ॥ २३ ॥ जिवा-शिवाची जडली समाधी । विटला प्रपंच तुटली उपाधी ॥ शुद्ध स्वरें गर्जति वेद चारी । तुज० ॥ २४ ॥ निधानकुंभ भरला अभंग । पाहा निजांगें शिव ज्योतिर्लिंग ॥ गंभीर धीर सुर चक्रधारी । तुज० ॥ २५ ॥ मंदार बिल्वें बकुलें सुवासी । माला पवित्र वहा शंकरासी ॥

काशीपुरीं भैरव विश्व तारी। तुज० ॥ २६ ॥ जाई जुई चंपक पुष्पजाती। शोभे गळां मालति माळ हातीं ॥ प्रतापसूर्य शर चापधारी । तुज० ॥ २७ ॥ अलक्ष्यमुद्रा श्रवणीं प्रकाशे। संपूर्ण शोभा वदनीं विकासे ॥ नेई सुपंथें मज पैलतीरीं। तुज० ॥ २८ ॥ नागेशनामा सकळां जिव्हाळा । मना जपे रे शिवमंत्रमाळा ॥ पंचाक्षरी ध्यानगुहा विहारी। तुज० ॥ २९ ॥ एकांतिं ये रे गुरुराज स्वामी। चैतन्यरूपीं शिव सौख्यनामीं ॥ शिणलों दयाळा बहुसाल भारी। तुज० ॥ ३० ॥

शास्त्राभ्यास नको श्रुती पढुं नको तीर्थासि जाऊं नको।
योगाभ्यास नको व्रतें मख नको तीव्रें तपें तीं नको ॥
काळाचें भय मानसीं धरुं नको दुष्टासि शंकूं नको।
ज्याचीया स्मरणें पतीत तरती तो शंभु सोडूं नको ॥ ३१ ॥

॥ श्रीसांबसदाशिवार्पणमस्तु ॥ शुभं भवतु ॥ ॐ तत्सत् ॥

## ॥ आरती ॥

लवथवती विक्राळा ब्रह्मांडीं माळा। विषें कंठ काळा त्रिनेत्रीं ज्वाळा॥ लावण्यसुंदर मस्तकीं बाळा। तेथुनियां जळ निर्मळ वाहे झुळझुळां ॥१॥ जय देव जय देव जय श्रीशंकरा। आरती ओवाळूं तुज कर्पुरगौरा ॥ध्रु०॥ कर्पुरगौरा भोळा नयनीं विशाळा। अर्धांगीं पार्वती सुमनांच्या माळा॥ विभुतीचें उधळण शितिकंठ नीळा। ऐसा शंकर शोभे उमावेल्हाळा ॥जय०॥२॥ देवीं दैत्यीं सागरमंथन पैं केलें। त्यामाजीं अवचित हळहळ जें उठिलें॥ तें त्वां असुरपणें प्राशन केलें। नीलकंठ नाम प्रसिद्ध झालें ॥जय०॥३॥ व्याघ्रांबर फणिवरधर सुंदर मदनारी॥ पंचानन मनमोहन मुनिजनसुखकारी। शतकोटीचें बीज वाचें उच्चारी। रघुकुळटिळक रामदासा अंतरीं॥ जय देव० ॥४॥

---

मुद्रक: वा. ग. ढवळे, कर्नाटक मुद्रणालय, १०३, शींव (पूर्व), मुंबई २२
प्रकाशक: केशव भिकाजी ढवळे, श्रीसमर्थ-सदन, गिरगांव, मुंबई ४

